**मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या प्रादेशिक कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि. ०१/०९/२०२१ ते दि. २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०२१/१११०/प्र.क्र.२६९/ मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २७/१०/२०२१

वाचा- १) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक-मुदतवाढ-२०२१/३९३/प्र.क्र.११५/मोप्र-(२), दि. ०६/०५/२०२१
२) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती यांचे पत्र.क्र. २९६०/आ-१/प्रा.का./मु.प्र./ बृधाक्र.१५३९/२०२१, दिनांक २०/०९/२०२१
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक १५/०२/२०२१
४) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्रमांक आढावा २००२(३३५/२००२)/आ (प्रशि), दि.०६/०२/२००३

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांची निर्मिती संदर्भाधिन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१/०३/२०२१ ते दिनांक ३१/०८/२०२१ पर्यत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती. संदर्भ क्रमांक ३ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती यांचे संदर्भ क्र. २ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आता मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे कर्मचारी कार्यरत असे पर्यंत चालू राहतील.
३) सदर पदे आकृती बंधानुसार मंजुर असतील.
४) उपरोक्त सर्व पदे व्यपगत झालेली नसतील.

उपरोक्त कार्यालयातील खर्च, मागणी क्रमांक आय-५ (नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष- ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली

अंशदान, (वेतन) (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ आय १७-१) या लेखाशीर्षाखाली महामंडळास मंजूर असलेल्या नियत अस्थाई आस्थापनेच्या वेतनाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक १०/०८/२०२१ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार तसेच आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११२४१५५२०७५१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Abhay Keshaorao Yedsikar

Digitally signed by Abhay Keshaorao Yedsikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, cn=Abhay Keshaorao Yedsikar
Date: 2021.11.24 15:58:26 +05'30'

**सहपत्र- परिशिष्ट 'अ'**

**( अभय येडसीकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत सहपत्रासह -**

१. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय,मुंबई.
२. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. महालेखापाल-१/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबधारे विकास महामंडळ, नागपूर.
५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.

यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजुरी दिलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/ कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील.

६. मोप्र-(२) संग्रहार्थ.

**<u>परिशिष्ट अ</u>**

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ -२०२१/१११०/प्र.क्र.२६९/मोप्र-(२), दिनाक : २७/१०/२०२१ चे सहपत्र नियत अस्थायी आस्थापनेवरील खालील नमूद ३० पदांना दि. ०१/०९/२०२१ ते दि. २८/२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | . |
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता | ३ | ३ |
| ५ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ६ | विशेष अधीक्षक | १ | १ |
| ७ | अधीक्षक | १ | १ |
| ८ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघुलेखक उच्चश्रेणी/निम्नश्रेणी (स्वीय सहायक) | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनीचालक | १ | १ |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |
| | **एकूण मुदतवाढीची पदे -३०** | | |